महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९
वेतननिश्चितीसंबंधी सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांक :- वेपूर - १०१४/प्र.क्र.५१/सेवा-९**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २४ जून, २०१५

पहा :- १) शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक-वेपुर १२०९/प्र.क्र.२७/सेवा-९,दि.२२ एप्रिल, २००९
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-वेपुर-१२०९/प्र.क्र.६९/सेवा-९,दि.२९ एप्रिल, २००९
३) केंद्र शासन, वित्त मंत्रालय, व्यय विभाग यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.१/१/२००८- आयसी, दि.१३ मार्च, २००९

राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांना वरील क्र.१ येथील आदेशान्वये दि.१ जानेवारी, २००६ पासून सुधारित वेतनसंरचना लागू करण्यात आली आहे. सदर अधिसूचनेतील परिच्छेद क्र.१० नुसार दि.१ जुलै रोजी ज्या कर्मचाऱ्याची सुधारीत वेतनसंरचनेत ६ महिने किंवा अधिक सेवा होईल ते कर्मचारी दि.१ जुलै रोजी वेतनवाढ मिळण्यास पात्र राहतील. सुधारीत वेतनसंरचनेत वेतननिश्चिती करण्यासाठी वेतननिश्चितीच्या नियमांच्या अनुषंगाने शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.वेपुर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२९ एप्रिल, २००९ अन्वये स्पष्टीकरणात्मक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर अधिसूचना व परिपत्रकामध्ये एखादा कर्मचारी नवीन नियुक्ती वा पदोन्नती मुळे नवीन वर्षाच्या पहिल्या दिवशी सदर पदावर रुजू होऊ इच्छित असल्यास, तथापि त्या दिवशी रविवार वा सार्वजनिक सुट्टी असल्यामुळे तो वर्षाच्या पहिल्या कामकाजाच्या दिवशी, कामावर हजर झाल्यास त्याची नवीन पदावर दि.१ जुलै रोजी सुधारित वेतनसंरचनेत सहा महिने किंवा त्यापेक्षा अधिक सेवा पूर्ण होऊ शकणार नाही अशा परिस्थितीत तो दि.१जुलै रोजी वेतनवाढ मिळण्यास पात्र ठरेल किंवा कसे? याबाबतची तरतूद सद्य:स्थितीत अस्तित्वात नाही.

केंद्र शासनाने सुधारित वेतन संरचनेतील वेतनवाढीसंदर्भात वरील क्र.३ येथील ज्ञापनान्वये स्पष्टीकरणात्मक आदेश निर्गमित केले आहेत. त्याअनुषंगाने वेतनवाढीसंदर्भात पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

केवळ दि.१ जानेवारी रोजी रविवार किंवा शासकीय सुट्टी असल्यामुळे एखादा कर्मचारी नियुक्ती अथवा पदोन्नतीच्या पदावर रुजू होऊ शकत नसेल व तो वर्षाच्या पहिल्या कामकाजाच्या दिवशी रुजू झाला असेल तर अशा कर्मचाऱ्याच्या सेवेस त्यावर्षीच्या दि.१ जुलै रोजी सहा महिने पूर्ण होतात असे गृहीत धरुन त्या कर्मचाऱ्यास त्या वर्षीची वेतनवाढ मंजूर करण्यात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०६२४११५८१८१९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhalchandra Jagannath Gadekar

Digitally signed by Bhalchandra Jagannath Gadekar
DN: CN = Bhalchandra Jagannath Gadekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.24 12:00:04 +05'30'

**( भा.ज.गाडेकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव
२) मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मंत्री व राज्य मंत्री यांचे स्वीय सहायक,
५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
६) महालेखापाल- १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
७) महालेखापाल- १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
८) महालेखापाल- २ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
९) महालेखापाल- २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
१०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४) लेखा अधिकारी, वेतन पडताळणी पथक (सर्व)
१५) निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-९)